दिनांक २१ नोव्हेबर रोजी राज्यात "जागतिक मत्स्यदिन" प्रभावीपणे साजरा करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय - मत्स्यवि-११२४/प्र.क्र.१५३/पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक .०९ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना -**

मत्स्यसंपदा शाश्वत स्वरुपात वृध्दींगत करणे हा उद्देश ठेवून दर वर्षी २१ नोव्हेंबर हा दिन "जागतिक मत्स्यदिन" म्हणून साजरा करण्यात येतो. मत्स्यपालनाचे महत्त्व अधोरेखित करण्यासाठी मत्स्यव्यवसायाशी संबंधित शेतकरी/संस्था/संघ/भागधारक यांच्या दृढ ऐक्याचे प्रदर्शन करण्यासाठी राज्यामध्ये विविध उपक्रम आयोजित करणे आवश्यक आहे. सदर जागतिक मत्स्यदिनाचे औचित्य साधून राज्यात मच्छीमार बांधवाची जनजागृती करणे, मच्छीमार बांधवांना राज्य व केंद्र शासनाच्या विविध योजनांची माहिती देणे व मत्स्यव्यवसाय क्षेत्राला प्रोत्साहन देण्यासाठी राज्यात विविध उपक्रम राबविण्यात येऊन "जागतिक मत्स्य दिन" राज्यात साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

"जागतिक मत्स्यदिनाचे" औचित्य साधून दिनांक २१ नोव्हेंबर रोजी राज्यात मत्स्यदिन साजरा करण्यासाठी मत्स्यव्यवसाय विभाग व क्षेत्रीय यंत्रणा यांनी खालीलप्रमाणे विविध उपक्रम राबविण्यात यावेत.

१. राज्यातील मच्छीमार सहकारी संस्थाचा मेळावा आयोजित करणे, मत्स्यव्यवसाय विभागातील विविध योजनांबाबत मच्छीमारांच्या सभा घेणे, प्रतिबंधीत मासेमारीबद्दल माहिती देणे.
२. प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजना तसेच मच्छीमारांशी संबंधीत सर्व योजनांची बॅनर्स, माहिती पुस्तिका इत्यादीव्दारे प्रसिध्दी करणे.
३. मच्छीमारांना तांत्रिक मार्गदर्शनाकरीता प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे.
४. विविध योजनांमार्फत विकसित करण्यात आलेल्या नवीन प्रकल्पांचे उद्घाटन करणे.
५. ई-श्रम कार्ड व किसान क्रेडीट कार्ड बाबत बँकांना पाचारण करुन चर्चा सत्र व कार्ड वाटप शिबीरे आयोजित करणे.
६. मत्स्यव्यवसाय क्षेत्रात सर्वोकृष्ट कामगिरी करणाऱ्या राज्य/विभाग/ जिल्हास्तरावर विविध क्षेत्रात मत्स्यसंवर्धक/मच्छीमार/मत्स्यकास्तकार इत्यादी यांना सर्वोत्कृष्ट जिल्हा (भूजल/सागरी), सर्वोत्कृष्ट सहकारी संस्था/संघ/मत्स्य शेतकरी उत्पादक संस्था (FFPOs), सर्वोत्कृष्ट मत्स्यसंवर्धक, सर्वोकृष्ट शासकीय/खाजगी मत्स्यबिज उत्पादन/संवर्धन केंद्र, स्वयं सहायता समूह (SHG), सर्वोत्कृष्ट वैयक्तिक उद्योजक, सर्वोत्तम अभिनव कल्पना /तंत्रज्ञान करणारा प्रकल्प, सर्वोत्कृष्ट शासकीय क्षेत्रातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रमाणपत्र व सन्मान चिन्ह इत्यादीव्दारे सन्मानित करणे.

७. केंद्र शासन/ राज्य शासनामार्फत विकसित करण्यात येणाऱ्या ॲपचा प्रसार करणे.

८. समुद्रातील घोस्ट नेट काढण्याचे, सागरी स्वच्छता, प्लास्टिक निर्मुलनाचे कार्यक्रम घेणे, कांदळवन, दुर्लभ प्रजाती मासे व कासव संरक्षण बद्दल प्रबोधन करणे.

९. मत्स्यपर्यटनास प्रोत्साहन देणाऱ्या कार्यक्रमांचे आयोजन करणे. (नौका नयन स्पर्धा, सी-फुड फेस्टिवल, सागरी खाद्य महोत्सव, गळ स्पर्धा, ॲंगलिंग इत्यादी)

१०.मत्स्यदिनानिमित्त मच्छीमार तसेच मत्स्यव्यवसायाशी संबंधित विविध व्यक्ती यांना आमंत्रित करुन चर्चासत्रे, प्रश्न मंजुषा, मनोरंजनात्मक कार्यक्रम व स्पर्धात्मक कार्यक्रम आयोजित करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०९१५१०३५५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KISHOR MAHADEO JAKHATE

Digitally signed by KISHOR MAHADEO JAKHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=83112e1445917d0a21fbab36d7c0ff41e09863c93a2e62ea1b0c01da16b7a161, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=032A6ACBFD529D66DD76E26EAB14B28C6DD07D2F776E529B44BA2CB45324C503, cn=KISHOR MAHADEO JAKHATE
Date: 2024.08.09 15:25:30 +05'30'

**( श्री. किशोर जकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव, (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव, (वित्त), मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद / लातूर/अमरावती/नागपूर
१०. सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभाग
११. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
१२. अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. सर्व उपकोषागार अधिकारी
१६. कक्ष अधिकारी-१२/१३/१६.
१७. निवडनस्ती